दिनांक ०१ ऑक्टोबर २०१८ पासून करपात्र वस्तू / सेवा अथवा दोन्हींसाठी पुरवठादाराला करावयाच्या प्रदानातून २% TDS वजावट करणेबाबत......

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : वसेक-१०२२/प्र.क्र.११/कराधान-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- २० जून, २०२३

वाचा: १. महाराष्ट्र वस्तू व सेवाकर कायद्यांतर्गत राज्यकर अधिसूचना क्र. ५०/२०१८ दि. १८ सप्टेंबर २०१८ मध्ये अधिसूचना क्र. ५७/२०१८ दि. २३.१०.२०१८, ६१/२०१८ दि ०५.११.२०१८ तसेच ७३ /२०१८ दि. ३१.१२.२०१८ नुसार करण्यात आलेल्या सुधारणेसह

२. शासन परिपत्रक क्र. संकिर्ण २०१८ / प्र.क्र.१४४/२०१८ कोषा प्रशा-५, दि २८ सप्टेंबर २०१८.

३. शासन परिपत्रक क्र. वसेक-१०२२/प्र.क्र. ११/कराधान-१, दि. ०३ फेब्रुवारी, २०२२.

**शासन परिपत्रक:-**

महाराष्ट्र वस्तू व सेवाकर अधिनियम, २०१७ व केंद्रिय वस्तू व सेवाकर अधिनियम, २०१७ च्या कलम ५१ नुसार वस्तू किंवा सेवा अथवा दोन्हींच्या संदर्भात पुरवठादार / कंत्राटदार यांना देय असलेल्या देयकाच्या एकूण रकमेमधून २% टी.डी.एस. वजावट करण्याच्या संदर्भात आहरण व संवितरण अधिकारी, कोषागार / उपकोषागार अधिकारी तसेच, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यानी अवलंबावयाच्या कार्यपध्दतीबाबत उपरोक्त संदर्भ क्र.२ नुसार सूचना देण्यात आल्या होत्या.

संदर्भ क्र. १ मधील अधिसूचनेत अधिसूचना क्र. ७३/२०१८ दि. ३१.१२. २०१८ अन्वये सुधारणा करण्यात आली आहे. सुधारित अधिसूचनेची प्रत यासोबत जोडण्यात आली आहे. या अनुषंगाने उपरोक्त संदर्भ क्र. २ मधील परिपत्रकात नमूद केलेल्या सुचनासंदर्भात सुधारित सूचना खालीलप्रमाणे निर्गमित करण्यात येत आहेत.

**आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावयाची कार्यवाही:-**

संदर्भ क्र. २ च्या परिपत्रकातील आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावयाच्या कार्यवाही मधील मुद्दा क्र.४ व १२ मधील सूचनांसंदर्भात सुधारित सूचना खालीलप्रमाणे निर्गमित करण्यात येत आहेत.

४) आहरण व संवितरण अधिकारी यांनी पुरवठादार / कंत्राटदार यांना देय असलेल्या रकमेबाबतची देयके तयार करताना देय असलेल्या एकूण रकमेमधून २% TDS वजावट करण्याची दक्षता घ्यावी २% TDS वजावट करण्यासाठी देण्यात आलेल्या लेखाशिर्षासमोर स्पष्टपणे रक्कम नमूद करणे आवश्यक राहील.

**तथापि, वस्तू व सेवा कर कायद्यातील कलम ५१ (१) मध्ये नमूद केलेल्या एका वजावटदाराने (TDS Deductor) वस्तू किंवा सेवा अथवा दोन्हींचा पुरवठा दुस-या वजावटदारास (TDS Deductor) केला असेल तर अशा प्रकरणात २% TDS वजावट करण्याची आवश्यकता नाही. या संदर्भात परिशिष्ट 'ड' म्हणजेच आहरण व संवितरण अधिकारी यांनी कोषागारास देयकासोबत सादर करावयाच्या प्रमाणपत्रामधील परिच्छेद तीन (III) व्दारे तसे प्रमाणित करणे आवश्यक असेल.**

**१२) आहरण व संवितरण अधिकारी यांनी देयकासोबत या परिपत्रकासोबत जोडलेल्या सुधारित परिशिष्ट 'ड' च्या नमुन्यात प्रमाणपत्र सादर करणे अनिवार्य आहे.**

**ब) कोषागार/उपकोषागार अधिकारी व अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांनी करावयाची कार्यवाही:-**

संदर्भ क्र २ च्या परिपत्रकातील कोषागार/ उपकोषागार अधिकारी व अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांनी करावयाच्या कार्यवाही मधील मुद्दा क्र. १ मधील सूचनांसंदर्भात सुधारित सूचना खालीलप्रमाणे निर्गमित करण्यात येत आहेत.

१) कोषागार / उपकोषागार अधिकारी व अधिदान व लेखा अधिकारी यानी दि ०१ ऑक्टोबर, २०१८ पासून देयक प्रदान करताना या देयकामधून २% TDS वजावट करण्यात आली आहे किंवा नाही याची तपासणी करावी व अशी वजावट केली नसल्यास देयके आक्षेपित करण्यात यावीत.
**तथापि, देयक सादर करताना या परिशिष्टा सोबत जोडलेल्या सुधारित परिशिष्ट 'ड' मधील परिच्छेद तीन नुसार प्रमाणित केले असल्यास, अशा प्रकरणात २% TDS करण्याची आवश्यकता नसल्याने, कोषागार / उपकोषागार अधिकारी व अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांनी असे देयक आक्षेपित करू नये.**

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२३०६२०१४५७५४९३०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANDAR ASHOK KELKAR

Digitally signed by MANDAR ASHOK KELKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=500b03a2acf8670cbc3af82871445df8c6c5862fbed7679822233103ec4e8926, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DC44279B721C6B725B0DB2B28A9A9ACEB0719B69B051F7861850C8129F723861, cn=MANDAR ASHOK KELKAR
Date: 2023.07.05 17:14:27 +05'30'

**( मंदार केळकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद व संसद सदस्य
३. राज्यपालांचे सचिव
४. मुख्यमंत्र्यांचे सचिव
५. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
७. मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
८. प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
९. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा) १, महाराष्ट्र, मुंबई
१०. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १, महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल (लेखापरीक्षा)- २, महाराष्ट्र, नागपूर
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र, मुंबई
१३. आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२.
१४. आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर ४४४००१.
१५. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई
१६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई

१७. सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१८. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१९. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२०. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२२. सर्व विभागीय आयुक्त.

**(सुधारित परिशिष्ट 'ड')**

**(आहरण व संवितरण अधिकारी / टी.डी.एस. वजावटदार यांनी सक्षम प्राधिकाऱ्याची मंजुरी घेत असताना देवकासोबत सादर करावयाचे प्रमाणपत्र)**

मी................................ (नाव).....................................(पदनाम), आहरण व संवितरण अधिकारी असून असे प्रमाणित करतो/ करते की, देयक क्र.......................... रक्कम रु......................../- (अक्षरी रु..............................) हे करपात्र वस्तू किंवा सेवा अथवा दोन्हींच्या पुरवठ्यासंदर्भात असून त्यासाठीच्या संविदेचे मुल्य रु. 2,50,000/- च्या वर आहे / नाही. (लागू नसलेले खोडावे)

I. * सदर करपात्र वस्तू किंवा सेवा यांच्या पुरवठ्याबाबत संविदेचे मुल्य रु. 2,50,000/- च्या वर असून

लेखाशिर्ष..........मधून रक्कम रु.............(अक्षरी रु.. ..........) 2% TDS वजावट करुन मला GSTN प्रणालीवर रक्कम जमा करण्यासाठी देण्यात यावी.

II. * सदर देयकांतर्गत पुरवठादार/ कंत्राटदार यांनी पुरवठा केलेल्या वस्तू किंवा सेवा अथवा दोन्हींच्या बाबतीत महाराष्ट्र वस्तू व सेवा कर कायद्यांतर्गत करमाफ असल्याने कराची वजावट करण्याची आवश्यकता नसल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

III. * सदर देयकांतर्गत पुरवठादार व प्राप्तकर्ता हे दोघेही वस्तू व सेवा कर कायदा, २०१७ च्या कलम ५१ (१) मधील नमूद व्यक्ती असल्याने अधिसूचना क्र. ५०/२०१८ दि. १८ सप्टेंबर २०१८ मध्ये अधिसूचना क्र. ५७/२०१८ दि २३.१०.२०१८, ६१/२०१८ दि ०५. ११. २०१८ तसेच ७३/२०१८ दि ३१.१२.२०१८ अन्वये करण्यात आलेल्या सुधारणेनुसार या प्रकरणी प्राप्तकर्त्याकडून पुरवठादारास वस्तू/सेवा अथवा दोन्हींच्या पुरवठयाबाबत करण्यात येणा-या प्रदानावर कराची वजावट करण्याची आवश्यकता नसल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

उपरोक्त (I) (II) किंवा (III) पैकी जे लागू नसेल ते खोडावे.

दिनांक :.............................................

आहरण व संवितरण अधिकारी यांची स्वाक्षरी

नाव:

GSTN नोंदणी क्रमांक:

पदनाम: